सामाजिक न्याय विभागाच्या अखत्यारीतील शासकीय वसतिगृहे व निवासी शाळातील विद्यार्थ्यांसाठी सोयी सुविधांतर्गत वस्तू खरेदी करण्यास मान्यता देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०२२/प्र.क्र.४० /शिक्षण-२**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: - ४ जुलै, २०२३

**वाचा:-**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-१०८२/ ९०३८५/ (३८)/ बीसीडब्ल्यु- ४, दि.१६ मे १९८४.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक:- बीसीएच-२००२/ प्र.क्र. २६८/ मावक-४, दि. ४ जुलै, २००३.
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-२०१०/ प्र.क्र. ४३०/ मावक-४, दि. २६ जुलै, २०११.
४. शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक:- भांखस-२०१४/ प्र.क्र. ८२/ भाग-III/ उद्योग-४, दि.०१ डिसेंबर, २०१६.
५. आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ शिक्षण/ सोयीसुवि/ शावगृ.शानिशा/ वस्तू खरेदी/ का-५ अ/ २१-२२/ ६८७, दि.११.२.२०२२.
६. आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शिक्षण/अभिभाषण २२-२३/सॅनॅडि/मशीन/का-५ अ / २२-२३/ पुणे /२४३९, दि.१३.६.२०२२.

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय विभागामार्फत राज्यात मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी शासकीय वसतिगृहे व अनुसूचित जाती व नवबौध्द मुला-मुलींसाठी शासकीय निवासी शाळा चालविल्या जातात. मागासवर्गीय शैक्षणिक संस्थांना सोयी-सुविधा पुरविणे या योजनेअंतर्गत सदर शासकीय वसतिगृहे व निवासी शाळांना संलग्न असलेली वसतिगृहे यांना आवश्यक असलेल्या वस्तूंच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ५ व ६ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखालील मागासवर्गीय मुलामुलींची शासकीय वसतीगृहे व शासकीय निवासी शाळांना संलग्न असलेल्या वसतिगृह विभाग येथे प्रवेशित विद्यार्थ्यांना दयावयाच्या सोयीसुविधाअंतर्गत मागणीच्या अनुषंगाने शासकीय वसतीगृह तसेच शासकीय निवासी शाळेतील विद्यार्थ्यांसाठी आवश्यक असलेल्या साहित्य /वस्तुंची खरेदी ई-निविदा / जेम पोर्टलवरून करण्यासाठी खालील रकान्यात नमूद केल्याप्रमाणे एकूण रू.५२,३५,५६,२४३/- (अक्षरी रूपये बावन्न कोटी पस्तीस लक्ष छप्पन हजार दोनशे त्रेचाळीस फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| ई गव्हर्नमेंट मार्केटप्लेस (GeM) वर किंवा ई निविदा प्रक्रीयेव्दारे खरेदी करावयाच्या वस्तु/बाबी | | | |
|---|---|---|---|
| अ. क्र. | वस्तूंचे नाव | मागणी | आकारमान |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | वही | १९४००० | Grammage of paper-80,rammage of cover paper-200, Capacity (%)-90, Smoothness of paper Bendtsen-(ml/min)-250 |
| २ | पाणी शुद्धीकरण यंत्र | ३५९ | Fully Automatic, Filtration Capacity Liter/ Hour- १२० with Storage Tank |
| ३ | व्यायाम साहित्य | ४६ | एकूण ३६ वस्तूंचा समावेश असलेला एक संच |
| ४ | संगणक | ३२३७ | Processor-Intel core i5 /AMD Ryzen 5, Operating System - Windows 10 Home /Any Compatible, RAM - 8GB (Recommended), Total HDD Capacity- 1000 GB, Monitor Resolution- 1600 x 900, RAM Expandability up to (using spare DIMM Slot in GB)- 64 |
| ५ | प्रयोगशाळा साहित्य | ५८ | एकूण ७० वस्तूंचा समावेश असलेला एक संच |
| ६ | स्पोर्टस युनिफॉर्म | १३६४९ | Fabric- Polyster, Fabric Construction - Woven, |
| ७ | स्वेटर | १७१८१ | - |
| ८ | नाईट ड्रेस | १९९७१ | रुंदी- ८९ सेमी,वार्प-८० DN Micra, वेप्ट- ४० s poly,रिड- १२६ EPI, पिक्स- ८६ PPI |
| ९ | सॅनिटरी नॅपकीन डिस्पेंसिंग मशीन | २७४ | Type of Machine-Automatic,Type of loading-spiral, Maximum storage Capacity-75-10 Nos, Material of the outer body-Mild steel,Built in Charger,Battery Back up-11-15 Hrs, Thickness of ss/ms,Visibility window, Digital Counter |

**२. उपरोक्त खरेदी संदर्भातील अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत :-**

अ) ई-निविदा /जेम (GEM) पोर्टलवरून विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच विहीत अटी, शर्तीच्या अधीन राहून खरेदी करण्यात यावी. सबंधित वस्तू/बाबींची खरेदी करण्यापूर्वी त्याची प्रत्यक्ष मागणी विचारात घेण्यात यावी.

आ) i. पुरवठादार संस्थेनी पुरवठा करावयाच्या वस्तुंचे नमुने आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्याकडे सादर करावेत.आयुक्त, समाज कल्याण यांनी सदर नमुन्याची गुणवत्ता सबंधित क्षेत्रातील तज्ञ संस्थेकडून तपासून नमुने अंतिम करावेत. सदर नमुने ज्या ठीकाणी मालाचा पुरवठा करण्यात येणार आहे, त्या

ठिकाणच्या वसतीगृहाच्या गृहपाल/अधीक्षक यांना पाठवून नमुन्याप्रमाणे वस्तू प्राप्त झाल्याचे त्यांच्याकडून प्रमाणित करून घ्यावेत.

ii. संगणकाचा पुरवठा विहीत मानकाप्रमाणे झाला असल्याबाबत उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दिनांक १.१२.२०१६ अन्वये विहीत केल्यानुसार शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या नियमपुस्तिकेतील परिशिष्ट-१२ अन्वये विहीत करण्यात आलेल्या मान्यताप्राप्त संस्थाकडून दर्जाबाबत तपासणी करून प्रमाणित झाल्यानंतरच देयके अदा करण्याची कार्यवाही करावी.

iii. आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांच्या स्तरावर विभागांतर्गत शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळामध्ये सोयीसुविधा खरेदीसाठी खरेदी समिती गठीत करण्यात आलेली आहे.सदर खरेदी समितीमध्ये आवश्यक वस्तू,बाबी खरेदी करण्याच्या अनुषंगाने जसे क्रीडा साहित्यासाठी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे यांनी नामनिर्देशित केलेला जिल्हा क्रीडा अधिकारी यांचा निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करण्यात यावा.त्यांच्याकडून सबंधित वस्तू,बाबींचा दर्जा व गुणवत्ता यांची खातरजमा करूनच खरेदी करण्यात यावी.

iv. पाणी शुध्दीकरण यंत्र,सॅनटरी नॅपकीन डिस्पेंसिंग मशीन खरेदी करताना त्याचे दर बाजारभावापेक्षा वाजवी आहेत याची खातरजमा करूनच खरेदी करण्यात यावी.

v. स्पोर्टस युनीफॉर्म, स्वेटर, नाईट ड्रेस यांच्या कपडयाची गुणवत्ता विहीत मानकाप्रमाणे असल्याचे वस्त्रोद्योग महामंडळाकडून प्रमाणित करून घेवून खरेदी करण्यात यावी.

vi. मालाचा पुरवठा करणाऱ्या संस्थेनी सबंधित वसतिगृहाच्या अधीक्षक/गृहपाल यांच्याकडे वरील मान्य करण्यात आलेले नमुने दाखवून त्यानुसार मालाचा पुरवठा करावा.

vii. मालाचा पुरवठा झाल्यानंतर अधीक्षक/गृहपालांनी पुरवठादाराकडून माल मिळाल्याची पोचपावती सबंधित जिल्हयाच्या सहायक आयुक्त, समाज कल्याण यांचेकडे सादर करावी.

viii. शासकीय वसतिगृहे व शासकीय निवासी शाळांना संलग्न असलेला वसतिगृह विभाग यातील प्रत्यक्ष विद्यार्थी संख्येनुसार करण्यात आलेली मागणी व पुरविण्यात आलेल्या वस्तु याबाबत पडताळणी करण्याची दक्षता आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी घ्यावी.

३. याकरीता आयुक्त,समाज कल्याण,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. याबाबत होणारा खर्च लेखाशिर्ष, मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०१) (०६) मागासवर्गीय शैक्षणिक संस्थावरील सोयी-सुविधा वाढविणे, (२२२५ ३३३१), ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाअंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर त्याअनुषंगाने खरेदीबाबतची प्रशासकीय कार्यवाही पूर्ण करून पात्र पुरवठादारांचे प्रस्ताव राज्यस्तरीय खरेदी समितीच्या मान्यतेसाठी सादर करतील.न्यूनतम दर असलेल्या पुरवठादाराकडून खरेदी प्रक्रीया पूर्ण झाल्यावर याबाबतची देयके प्रमाणित करून आवश्यक कागदपत्रासह निधी मागणीबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावा.

४. सदर आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३ /प्र.क्र.३० /२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.४. २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.४, परि.क्र.२७ (२) (अ), भाग-पहिला, उपविभाग-२, अ.क्र.७४, नियम क्र. २७-अ, नियम क्र.७६, अ.क्र. ३७, नियम क्र.९०, अ.क्र.४५, नियम क्र.१६९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ७७३ / व्यय-१४, दिनांक ७.९.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७०४१५१९४५५४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2023.07.04 15:21:05 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा) (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण,
५. सर्व सहायक आयुक्त,समाज कल्याण,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
७. कार्यासन अधिकारी,वित्त विभाग,व्यय-१४, मंत्रालय, मुंबई-३२,
८. सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
९. निवड नस्ती (शिक्षण-२).